लोकमंगल मल्टीस्टेट को.ऑप. सोसायटी लि.,जि.सोलापूर या संस्थेचा ५० हजार लिटर वरुन १ लक्ष लिटर दुग्धशाळेचे विस्तारीकरण व १० मे.टन दुग्धभुकटी निर्मिती प्रकल्प प्रस्ताव.
राष्ट्रीय कृषि विकास योजना....

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : राकृवि-२०१५/प्र.क्र. १६३/पदुम-८**

मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२

तारीख : २२ नोव्हेंबर, २०१८

वाचा -:१) आयुक्त, दुग्धव्यवसाय कार्यालयाचे पत्र क्रमांक आदुवि-६/RKVY/लोकमंगल/भाग-१/२०१५-१६/४२७, दिनांक १७.११.२०१५.

२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, समक्रमांकीत दिनांक १९ जानेवारी, २०१८.

३) शासन निर्णय क्रमांक, राकृवि-०३१७/प्र.क्र.२३/राकृवियो कक्ष, दि.२८ मार्च, २०१८.

४) शासन पत्र क्रमांक तक्रार-२०१८/प्र.क्र.१०८/पदुम-८, दिनांक ११ सप्टेंबर, २०१८.

५) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्रमांक आदुवि-६/RKVY/न.क्र.३९/ लोकमंगल तक्रार/२०१८/१५०३, दिनांक १२.१०.२०१८.

६) मा.लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे सुनावणी आदेश क्रमांक LA/COM/3029/2018 (T-4), दिनांक २९.१०.२०१८.

७) व्यवस्थापक, लोकमंगल मल्टीस्टेट को.ऑप.सोसायटी लि.,जि.सोलापूर यांचे पत्र क्रमांक LMCS/Adm/906/2018, दिनांक १२.११.२०१८.

**प्रस्तावना-:**

संदर्भाधीन क्रमांक १ अन्वये आयुक्त, दुग्धव्यवसाय या कार्यालयाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार “पायाभूत सुविधा व साधनसामुग्री” या घटकाखाली लोकमंगल मल्टीस्टेट को.ऑप.सोसायटी लि.,जि.सोलापूर या संस्थेचा रुपये २४.८१ कोटी इतक्या रक्कमेचा ५० हजार लिटर वरुन १ लक्ष लिटर दुग्धशाळेचे विस्तारीकरण व १० मे.टन क्षमतेचा दुग्धभुकटी प्रकल्प प्रकल्प प्रस्ताव शासनास शिफारस करुन सादर केला होता.

२. उपरोक्तप्रमाणे शासनास प्रस्ताव प्राप्त झाल्यावर विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन संदर्भाधीन क्रमांक २ अन्वये शासनाने लोकमंगल मल्टीस्टेट को.ऑप.सोसायटी लि.,जि.सोलापूर या संस्थेच्या रुपये २४.८१ कोटी इतक्या प्रकल्प किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी व प्रथम टप्प्यात रुपये २.०० कोटी इतका निधी वितरणास मान्यता दिली होती. सदर प्रकल्प प्रस्ताव हा केंद्र शासनाच्या NPDD या कार्यक्रमासाठी निश्चित केलेल्या निधी संरचनेच्या समांतर अर्थसहाय्यावर राकृवियो हिस्सा ५० व लाभार्थी हिस्सा ५० असा मंजूर करण्यात आला होता. दरम्यानच्या कालावधीत संदर्भाधीन क्रमांक ३ अन्वये सदर संस्थेच्या प्रकल्पास दुसऱ्या टप्प्यात रुपये ३.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला. आतापर्यंत वितरीत करण्यात आलेला रुपये ५.०० कोटी इतका निधी जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी व संस्थेचे अध्यक्ष यांचे संयुक्त खात्यामध्ये जमा करण्यात आला.

३. उपरोक्त संस्थेच्या प्रकल्प अहवालातील काही कागदपत्रांच्या संदर्भात शासनाकडे तसेच, मा.लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य व आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचेकडे प्राप्त झाली होती. सदर तक्रारीच्या अनुषंगाने शासनाने संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये आयुक्त, दुग्धव्यवसाय यांना अहवाल सादर करणेबाबत कळविले होते. आयुक्त दुग्धव्यवसाय यांनी संदर्भाधीन क्रमांक ५ अन्वये तक्रारीत तथ्य आढळल्याचा अहवाल शासनास सादर केला. सदर अहवाल दिनांक २९.१०.२०१८ रोजी मा.लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचेकडे झालेल्या सुनावणीत सादर करण्यात आला. सदर सुनावणीचे अंतरिम आदेश संदर्भाधीन क्रमांक ६ अन्वये शासनास प्राप्त झाले.

४. सदर प्रकरणी लोकमंगल मल्टीस्टेट को.ऑप.सोसायटी लि.,जि.सोलापूर या संस्थेविरुद्ध तक्रार असल्याने नैसर्गिक न्यायाच्या तत्वानुसार दिनांक १२.११.२०१८ रोजी प्रधान सचिव (पदुम) यांनी सुनावणी ठेवून संस्थेचे म्हणणे ऐकून घेतले. सदर सुनावणीत संदर्भाधीन क्रमांक ६ अन्वये संस्थेने आपले लेखी म्हणणे शासनास सादर केले आहे. आपल्या लेखी म्हणण्यात संस्थेने असे नमूद केले आहे की, लोकमंगल प्रोडक्ट लि. व लोकमंगल मल्टीस्टेट को. ऑप. सोसायटी, सोलापूर या संस्थांमध्ये दिनांक २२ मे, २०१५ रोजी करारनामा झाला असून, लोकमंगल प्रोडक्ट लि. या संस्थेची जमीन तेथील इमारत व यंत्रसामुग्रीसह २९ वर्ष ११ महिने भाडेतत्वावर दिली आहे. लोकमंगल प्रोडक्ट या संस्थेकडे अधिकृत परवाने असून, सदर परवाने लोकमंगल मल्टीस्टेट या संस्थेचा राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत प्रकल्प प्रस्ताव सादर करताना जिल्हा दुग्ध व्यवसाय अधिकारी, सोलापूर यांचेकडे सादर करण्यात आली होती. सदर प्रकल्प अहवालाच्या आधारे शासनाने संस्थेचा प्रकल्प मंजूर केला. मात्र, तद्नंतर वर्तमानपत्रामध्ये सदर प्रकल्प मंजूर करताना संस्थेने सादर केलेले परवाने खोटे असल्याचे संस्थेला समजल्यावर या प्रकरणाची चौकशी होईपर्यंत मंजूर झालेल्या रक्कमेपैकी एकही पैसा खर्च न करण्याचा संस्थेच्या संचालक मंडळाने निर्णय घेतला आहे. लोकमंगल प्रोडक्ट लि. या संस्थेने मिळविलेली सर्व परवानगीपत्रे अधिकृत असल्याने लोकमंगल मल्टीस्टेट को.ऑप.सोसायटी या संस्थेमार्फत खोटी परवानगीपत्रे सादर करण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही. ही वस्तुस्थिती असताना कुणीतरी अज्ञात व्यक्तीने राजकीय द्वेषापोटी सदर कागदपत्रे बदलली आहेत अशी शंका आपल्या अहवालात उपस्थित केली आहे.

५. लोकमंगल मल्टीस्टेट को.ऑप.सोसायटी लि.,जि.सोलापूर यांनी वरीलप्रमाणे आपली भूमिका जरी मांडली असली, तरी सदर संस्थेस उपलब्ध सविस्तर प्रकल्प अहवालातील कागदपत्रांच्या आधारे दिलेली मान्यता तसेच सदर मान्यतेविरुद्ध प्राप्त झालेली तक्रार व आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी शासनास सादर केलेला यासंदर्भातील अहवाल लक्षात घेऊन, लोकमंगल मल्टीस्टेट को.ऑप.सोसायटी लि.,जि.सोलापूर या संस्थेस संदर्भाधीन क्रमांक २ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेबाबत फेरविचार करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे.

**शासन निर्णय :**

लोकमंगल मल्टीस्टेट को.ऑप.सोसायटी लि.,जि.सोलापूर या संस्थेच्या राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत रुपये २४.८१ कोटी इतक्या रक्कमेच्या सादर केलेल्या प्रकल्प प्रस्तावातील कागदपत्रांच्या तक्रारीची चौकशी करुन, तक्रारीत तथ्य असल्याचा अहवाल संदर्भाधीन क्रमांक

५ अन्वये आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी शासनास सादर केला असल्याने, सदर कागदपत्रांच्या आधारे संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला लोकमंगल मल्टीस्टेट को.ऑप.सोसायटी लि.,जि.सोलापूर या संस्थेचा प्रस्ताव या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रकल्प रद्द करण्यात आल्यामुळे या प्रकल्पासाठी संदर्भाधीन क्रमांक २ व ३ अन्वये मंजूर करण्यात आलेला रुपये ५.०० कोटी इतका निधी राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्षास प्रत्यार्पित करण्याची कार्यवाही आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी त्वरित करावी. संस्थेने संदर्भाधीन क्रमांक ७ अन्वये दिलेल्या लेखी म्हणण्यानुसार संस्थेस आवश्यकतेनुसार वैध कागदपत्रांसह नव्याने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत प्रकल्प प्रस्ताव सादर करण्याची मूभा राहिल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२२१२५७४२७२०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture & ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2018.11.22 13:04:52 +05'30'

**(राजेश गोविल)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (पदुम)/ मा.राज्यमंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य.
८. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,पुणे विभाग, पुणे.
९. विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) पुणे विभाग, पुणे.
१०.जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, सोलापूर.
११.जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सोलापूर.
१२.जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, सोलापूर.
१३.महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
१४.निवडनस्ती.